**श्री.रनजीत सिंह देओल, प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, श्री.सुहास दिवसे, आयुक्त, क्रीडा व युवक सेवा व श्री.सुनिल हंजे, उपसचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांना जर्मनी व स्वित्झर्लंड या देशांचा परदेश दौरा करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विदौरा-२०२३/प्र.क्र.४८/क्रीयुसे-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १० मे, २०२३.

**वाचा -**

१) श्री.मोरीट्झ मॅटस (Moritz Mattes) व मॅक्समिलन हॅसचके (Maxmilian Haschke) एफ.सी.बायर्न, म्युनिच, जर्मनी यांचे दि.६ डिसेंबर,२०२२ रोजीचे पत्र

२) डॉ.क्लाऊडे स्ट्रीकर (Claude Stricker) कार्यकारी संचालक, इंटरनॅशनल अकॅडमी ऑफ स्पोर्टस सायन्स ॲन्ड टेक्नोलॉजी (AISTS), लॉसने, स्वित्झर्लंड यांचे दि.३१.३.२०२३ रोजीचे पत्र

**प्रस्तावना-**

राज्यात फुटबॉल खेळाचा प्रचार व प्रसार करण्यासाठी राज्य शासन पावले उचलत आहे. याचाच एक भाग म्हणून राज्य शासनाने (क्रीडा विभाग) फुटबॉल क्लब बायर्न, म्युनिच, जर्मनी या जगप्रसिध्द व फुटबॉल स्पर्धांमध्ये अत्यंत यशस्वी असलेल्या संस्थेसोबत फुटबॉल या खेळाच्या प्रशिक्षण व विकासाच्या अनुषंगाने सहकार्य करार करण्यात आलेला आहे. त्यानुसार राज्यातील १४ वर्षाखालील २० खेळाडू, क्रीडा मार्गदर्शक व व्यवस्थापक यांना फुटबॉल खेळाच्या अद्ययावत प्रशिक्षणाकरीता जर्मनी येथे पाठविण्यास शासन निर्णय,दि. १५ मार्च, २०२३ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर फुटबॉल क्लब बायर्न, म्युनिच, जर्मनी या संस्थेने तेथील उच्च दर्जाच्या पायाभूत सुविधा, क्रीडा संकुल व्यवस्थापन, खेळाडूंची निवड, अत्याधुनिक प्रशिक्षण, क्रीडा विज्ञान यासंदर्भात पाहणी व अभ्यास करण्यासाठी मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण तसेच इतर संबधित अधिकाऱ्यांना जर्मनी येथे आमंत्रित केले आहे. त्याचप्रमाणे डॉ.क्लाऊडे स्ट्रीकर, कार्यकारी संचालक, इंटरनॅशनल अकॅडमी ऑफ स्पोर्टस सायन्स ॲन्ड टेक्नोलॉजी (AISTS), लॉसने, स्वित्झर्लंड यांनी मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांची मुंबई येथे भेट घेऊन स्वित्झर्लंड येथे योग व मल्लखांब केंद्र स्थापन करण्यासाठी तसेच राज्याच्या क्रीडा क्षेत्रास आधुनिक व आंतरराष्ट्रीय दर्जाच्या प्रशिक्षण व क्रीडा शिक्षणाची जोड देण्यासाठी स्वित्झर्लंड येथील इंटरनॅशनल अकॅडमी ऑफ स्पोर्टस सायन्स ॲन्ड टेक्नोलॉजी (AISTS)

या क्रीडा शिक्षण व प्रशिक्षणाकरिता जगप्रसिध्द असलेल्या संस्थेस भेट देण्याची विनंती केली आहे. सदर इंटरनॅशनल अकॅडमी ऑफ स्पोर्टस सायन्स ॲन्ड टेक्नोलॉजी (AISTS), लॉसने, स्वित्झर्लंड या संस्थेमार्फत चालविण्यात येणाऱ्या आंतरराष्ट्रीय दर्जाच्या क्रीडा विषयक अभ्यासक्रमांचा / प्रशिक्षणाचा लाभ ऑनलाईन माध्यमातून राज्यातील खेळाडू, प्रशिक्षक, क्रीडाशिक्षक, क्रीडा अधिकारी इत्यादींना देण्याकरिता या संस्थेसोबत करार करण्याचे प्रस्तावित आहे.

२. यानुषंगाने श्री. गिरीष महाजन, मा.मंत्री (क्रीडा व युवक कल्याण) यांच्या समवेत दि.१८ मे,२०२३ ते दि.२६ मे,२०२३ या कालावधीत जर्मनी (एफ.सी. बायर्न,म्युनिच) व स्वित्झर्लंड (AISTS, लॉसने) येथे उपस्थित राहणेकरीता श्री. रनजीत सिंह देओल, प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, श्री.सुहास दिवसे,आयुक्त, क्रीडा व युवक सेवा व श्री.सुनिल हंजे, उपसचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांच्या परदेश दौऱ्यास मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

एफ.सी. बायर्न, म्युनिच (Munich) जर्मनी आणि इंटरनॅशनल अकॅडमी ऑफ स्पोर्टस सायन्स ॲन्ड टेक्नोलॉजी (AISTS), लॉसने (Lausanne), स्वित्झर्लंड या क्रीडाक्षेत्रातील जगप्रसिध्द संस्थांनी संदर्भाधिन पत्रान्वये तेथे भेट देण्याकरिता आंमत्रित केल्यानुसार श्री.गिरीष महाजन,मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांच्या नेतृत्वात जर्मनी व स्वित्झर्लंड येथे दौ-याचे आयोजन केले आहे. सदर दौऱ्यात पुढील महत्वपुर्ण बाबींची पाहणी व अभ्यास करण्यात येणार असून राज्याच्या क्रीडाक्षेत्राच्या हिताच्या व विकासाच्या अनुषंगाने तांत्रीक व ज्ञानवर्धनाकरिता सदर दौरा उपयुक्त ठरणार आहे.

१) आंतरराष्ट्रीय स्तरावरील क्रीडाक्षेत्रातील पायाभूत सुविधा निर्मिती, व्यवस्थापन आणि देखभालीचे विविध पैलू
२) क्रीडासंकुलाचे व्यवस्थापन तसेच संकुलासंदर्भातील अन्य महत्वपुर्ण बाबी
३) युवा आणि तळागाळातील क्रीडा विकास धोरण, उच्च कार्यक्षमता केंद्रांची रणनीती आणि प्रक्रिया
४) क्रीडा रणनीतीमध्ये क्रीडा विज्ञान आणि क्रीडा औषधे यांचा समावेश
५) क्लब, खेळाडू आणि शासनाव्दारे स्पोर्टस् टेक्नॉलॉजीचा घेण्यात येणारा लाभ तसेच त्यास दिले जाणारे पाठबळ.
६) क्रीडा उपकरणांव्दारे गुणात्मक तसेच सूक्ष्मस्तरापासून विश्लेषण
७) अत्याधुनिक प्रशिक्षण पध्दती, कपॅसीटी बिल्डिंग प्रक्रिया व खेळाडूंची निवड पध्दती
८) मल्लखांब व योगा सेंटरची उभारणी आणि प्रचार व प्रसार

**सदर जर्मनी व स्वित्झर्लंड येथील दौऱ्यासाठी श्री.गिरीष महाजन, मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण यांच्या समवेत श्री.रनजीत सिंह देओल,प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, श्री.सुहास दिवसे, आयुक्त, क्रीडा व युवक सेवा,पुणे व श्री.सुनिल हंजे, उपसचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग यांना जर्मनी व स्वित्झर्लंड या देशांचा परदेश दौरा करण्यासाठी याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.**

**२.** प्रस्तुत परदेश दौरा दिनांक १८ मे, २०२३ ते दि.२६ मे, २०२३ (प्रवासासह )या कालावधीसाठी राहील. सदर परदेश दौरा पुर्ण झाल्यानंतर संबधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या विदेश दौऱ्यासंबधीचा अहवाल प्रशासकीय विभागास आणि सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. तसेच विदेश दौऱ्यात प्राप्त केलेल्या ज्ञानाचा / कौशल्याचा उपयोग अन्य अधिकारी / कर्मचारी यांना प्रशिक्षण देण्यासाठी करावा.

**३.** सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग अनौ.सं.क्रं.४२/२०२३/११, दि.९.५.२०२३ अन्वये मिळालेल्या शिफारस समितीच्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर परदेश दौऱ्यास केंद्रशासनाच्या संबधित मंत्रालयांची (विदेश/वित्त/क्रीडा) आवश्यकतेप्रमाणे मान्यता घ्यावी.

**४.** सदर शासकीय दौऱ्याचा संपूर्ण खर्च शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत असलेल्या क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे या कार्यालयामार्फत करण्यात येणार आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१०१११६५६३०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2023.05.10 11:16:31 +05'30'

**(रणसिंग डेरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. सचिव, क्रीडा मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली
२. सचिव, अर्थ मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली,
३. सचिव, परराष्ट्र मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
४. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
५. अतिरिक्त मुख्य सचिव (मुख्यमंत्री सचिवालय), मंत्रालय, मुंबई
६. अतिरिक्त मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अतिरिक्त मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.उपसचिव, क्रीडा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सह संचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य,पुणे.